राज्यातील १० महानगरपालिका, २५ जिल्हा परिषदा व २८३ पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणूका - फेब्रुवारी २०१७ करीता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक मतदान २०१७/प्र.क्र.१३/कामगार ९**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक : २ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ** : राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१७/प्र.क्र.५/का.७ दिनांक १८/०१/२०१७ चे पत्र

**शासन परिपत्रक**

राज्य निवडणूक आयोगाने राज्यातील १० महानगर पालिका, २५ जिल्हा परिषदा व २८३ पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणूकांचा कार्यक्रम घोषित केला आहे. सदर निवडणूका खालील तक्त्यानुसार होणार आहेत.

**अ) दिनांक १६/०२/२०१७ रोजी निवडणूका होणाऱ्या १५ जिल्हा परिषदा व १६५ पंचायत समित्या**

| अ. क्र. | विभाग | जिल्हा परिषदेचे नाव | पंचायत समितीचे नाव |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | जळगांव | चोपडा, यावल, रावेर, मुक्ताईनगर/एदलाबाद, बोदवड, भुसावळ, जळगाव, धारणगाव, अंमळनेर, पारोळा, एरंडोल, जामनेर, पाचोरा, भडगांव व चाळीसगाव (एकूण १५) |
| २ | | अहमदनगर | अकोले, संगमनेर, कोपरगाव, राहाता, श्रीरामपूर, नेवासा, शेवगांव, पाथर्डी, अहमदनगर, राहुरी, पारनेर, श्रीगोंदा, कर्जत व जामखेड (एकूण १४) |
| ३ | औरंगाबाद | औरंगाबाद | सोयगाव, सिल्लोड, कन्नड, फुलंब्री, खुल्ताबाद, वैजापूर, गंगापूर, औरंगाबाद व पैठण (एकूण ९) |
| ४ | | जालना | भोकरदन, जाफ्राबाद, बदनापूर, जालना, मंठा, परतूर, घनसावंगी व अंबड (एकूण ८) |
| ५ | | परभणी | जिंतूर, परभणी, मानवत, सेलू, पाथरी, सोनपेठ, पुर्णा, पालम व गंगाखेड (एकूण ९) |
| ६ | | हिंगोली | हिंगोली, कळमनुर, सेनगांव, औधनागनाथ व वसमत (एकूण५) |
| ७ | | बीड | गेवराई, माजलगांव, वडवाणी, बीड, शिरुर (कासार), पातोडा, आष्टी, केज, धारुर, परळीव अंबेजोगाई (एकूण ११) |
| ८ | | नांदेड | माहुर, किनवट, हिमायतनगर, हदगांव, अर्धापूर, नांदेड, मुदखेड, भोकर, उमरी, धर्माबाद, बिलोली, नायगांव (खु.), लोहा, कंधार, मुखेड व देगलूर (एकूण १६) |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | | उस्मानाबाद | परांडा, भूम, वाशी, कळंब, उस्मानाबाद, तुळजापूर, नवीन लोहारा व उमरगा (एकूण ८) |
| १० | | लातूर | अहमदपूर, जळकोट, उद्गीर, चाकूर, रेणापूर, लातूर, शिरुर (अनंतपाळ), देवनी, औसा व निलंगा (एकूण १०) |
| ११ | अमरावती | बुलढाणा | जळगांव-जमोद, संग्रामपूर, शेगाव, नांदुरा, मलकापूर, मातोळा, खामगाव, मेहेकर, चिखली, बुलढाणा, देऊळगांवराजा, सिंदखेडराजा व लोणार (एकूण १३) |
| १२ | | यवतमाळ | उमरखेड, महागांव, पुसद, दिग्रस, आर्णी, दारव्हा, नेर, यवतमाळ, बाभूळगाव, कळंब, राळेगांव, मारेगांव, वणी, झरीझामणी, केळापूर व घाटंजी (एकूण १६) |
| १३ | नागपूर | वर्धा | आष्टी, कारंजा, आर्वी, सेलू, वर्धा, समुद्रपूर, देवळी व हिंगणघाट (एकूण ८) |
| १४ | | चंद्रपूर | चिमूर, नागभीड, ब्रम्हपूरी, सिंदेवाही, भद्रावती, वरोरा, चंद्रपूर, मूल, सावली, पोंभूर्णा, गोंडपिंपरी, बल्लारपूर, कोरपणा, जिवती व राजूरा (एकूण १५) |
| १५ | | गडचिरोली | कोरची, कुरखेडा, देसाईगंज (वडसा), आरमोरी, धानोरा, गडचिरोली, चार्मोशी व मुलचेरा |

**ब) दिनांक २१/०२/२०१७ रोजी निवडणूका होणाऱ्या १० महानगर पालिका, ११ जिल्हा परिषदा व ११८ पंचायत समित्या**

**i) महानगर पालिका** : १) बृहन्मुंबई, २) ठाणे, ३) उल्हासनगर, ४) पुणे, ५) पिंपरी-चिंचवड, ६) सोलापूर, ७) नाशिक, ८) अकोला, ९) अमरावती व १०) नागपूर

**ii) जिल्हापरिषदा व पंचायत समित्या**

| अ. क्र. | विभाग | जिल्हा परिषदेचे नाव | पंचायत समितीचे नाव |
|---|---|---|---|
| १ | कोकण | रायगड | पनवेल, कर्जत, खालापूर, सुधागड, पेण, उरण, अलिबाग, मुरुड, रोहा, तला, माणगांव, म्हसाळा, श्रीवर्धन, महाड व पोलादपूर (एकूण १५) |
| २ | | रत्नागिरी | मंडणगड, दापोली, खेड, चिपळूण, गुहागर, रत्नागिरी, संगमेश्वर, लांजा व राजापूर (एकूण ९) |
| ३ | | सिंधुदुर्ग | वैभववाडी, कणकवली, देवगड, मालवण, कुडाळ, वेंगुर्ला, सावंतवाडी व दोडामार्ग (एकूण ८) |
| ४ | नाशिक | नाशिक | बागलान, मालेगांव, देवळा, कळवण, सुरगणा, पेठ, दिंडोरी, चांदवड, नांदगाव, येवला, निफाड, नाशिक, त्रंबकेश्वर, इगतपुरी व सिन्नर (एकूण १५) |
| ५ | पुणे | पुणे | जुन्नर, आंबेगाव, शिरुर, खेड, मावळ, मुळशी, हवेली, दौंड, पुरंदर, वेल्हे, भोर, बारामती व इंदापूर (एकूण १३) |
| ६ | | सातारा | खंडाळा, फलटण, माण, खटाव, कोरेगांव, वाई, महाबळेश्वर, जावली, सातारा, पाटण व कराड (एकूण ११) |
| ७ | | सांगली | आटपाडी, जत, खानापूर (विटा), कडेगांव, तासगांव, कवठे महांकाळ, पलूस, वाळवा, शिराळा व मिरज (एकूण १०) |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | | सोलापूर | करमाळा, म्हाडा, बार्शी, उत्तर सोलापूर, मोहोळ, पंढरपूर, माळशिरस, सांगोला, मंगळवेढा, दक्षिण सोलापूर व अक्कलकोट (एकूण ११) |
| ९ | | कोल्हापूर | शाहुवाडी, पन्हाळा, हातकणंगले, शिरोळ, कागल, करवीर, गगनबावड, राधानगरी, भुदरगड, आजरा, गडहिंग्लज व चंदगड (एकूण १२) |
| १० | अमरावती | अमरावती | चिखलदरा, चांदूरबाजार, मोर्शी, वारुड, अमरावती, अचलपूर, अंजनगांव, दर्यापूर, भातकूली व नांदगाव खांदेश्वर (एकूण १०) |
| ११ | नागपूर | गडचिरोली | एटापल्ली, भामरागड, अहेरी व सिरोंचा (एकूण ४) |

२. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २४३ झेडए अन्वये राज्य निवडणूक आयोगावर महानगर पालिकांच्या/जिल्हा परिषद पंचायत समितीच्या निवडणुकांची जबाबदारी सोपविली आहे. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १४ (४) मधील तरतूदीनुसार निवडणूका शांत, मुक्त व निर्भय वातावरणात घेण्याकरीता निदेश देण्याचे अधिकार राज्य निवडणूक आयोगास आहेत.

३. त्यानुसार उपरोक्त निवडणूक क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्यादृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी अथवा कामाच्या तासांमधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्याबाबत योग्य ते निदेश सर्व संबंधीतांना तात्काळ देण्याबाबत संदर्भाधीन पत्रान्वये राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांनी कळविले आहे.

४. या पार्श्वभूमीवर उपरोक्त मतदान क्षेत्रातील विविध दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापना यांना सूचना देण्यात येत आहेत की, आपल्या आस्थापनामधील कामगारांना सदर निवडणूकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

५. मतदानाच्या दिवशी वरील निवडणूक क्षेत्रात कामगारांच्या अनुपस्थितीमूळे धोका अथवा मोठ्या प्रमाणात नुकसान होईल अशा आस्थापनेतील/ उद्योगातील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम/ अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यामधील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी दोन तासांची सवलत देण्यात यावी.

६. सदर परिपत्रक राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांच्या क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१७/प्र.क्र. ५/का. ७ दिनांक १८/०१/२०१७ च्या पत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०२१५२३३९३७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2017.02.02 15:26:04 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**

शासनाचे उप सचिव

**प्रत - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित**

१. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.

२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई ५१.
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई
५. संचालक, बाष्पके, बांद्रा, मुंबई
६. जिल्हाधिकारी/मुख्य कार्यकारी अधिकारी, जळगाव, अहमदनगर, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मनाबाद, लातूर, बुलढाणा, यवतमाळ, वर्धा, चंद्रपूर, गडचिरोली, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर व अमरावती
७. आयुक्त, बृहन्मुंबई/ ठाणे/ उल्हानगर/ पुणे/ पिंपरी-चिंचवड/ सोलापूर/ नाशिक/ अकोला/ अमरावती/ नागपूर महानगर पालिका
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. कामगार विभागातील सर्व कार्यासने
१०. निवडनस्ती (कामगार ९)

**प्रत माहितीसाठी :**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.